**यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे बारामती, येथील उपकेंद्र व ग्रंथालय इमारतींचे बांधकाम करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. बैठक-२०२१/प्र.क्र.३६/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २५ नोव्हेंबर, २०२१.

वाचा :- १) कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे दि.०३.११.२०२१ रोजीचे पत्र.
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.२०.०९.२०१९

**प्रस्तावना :-**

यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक विद्यापीठाची स्थापना महाराष्ट्र विधी मंडळ कायदा क्र.२० अन्वये दि.०१.०७.१९८९ रोजी झाली आहे. विद्यापीठ अनुदान आयोगाची मान्यता असलेल्या या विद्यापीठाचे कार्यक्षेत्र संपूर्ण महाराष्ट्र राज्य आहे. महाराष्ट्रात या विद्यापीठाची अमरावती, नागपूर, औरंगाबाद, मुंबई, नाशिक, पुणे, कोल्हापूर व नांदेड असे ८ विभागीय केंद्र कार्यरत आहेत. विद्यापीठाच्या ८ विभागीय केंद्रामार्फत १६०० अभ्यासकेंद्रावर नियंत्रण ठेवले जाते. विद्यापीठाची जवळपास ६ लक्ष इतकी विद्यार्थी संख्या आहे. पुणे विभागीय केंद्रातंर्गत पुणे, सातारा व सोलापूर येथे अनुक्रमे १६०, ३६ व ७१ अशी एकूण २६७ अभ्यासकेंद्र असून, या अभ्यासकेंद्रावर एकूण १ लक्षपर्यंत विद्यार्थी प्रवेश घेतात. विद्यार्थ्यांची प्रवेश क्षमता विचारात घेता तसेच कामाचे विकेंद्रीकरण व्हावे या हेतूने विद्यार्थ्यांना सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी उपकेंद्राची आवश्यकता आहे त्यामुळे पुणे विभागीय केंद्रातंर्गत सध्या असलेल्या सातारा व सोलापूर जिल्ह्यासाठी बारामती येथे स्वतंत्र उपकेंद्र व ग्रंथालय करुन इमारत बांधकाम करणे प्रस्तावित होते.

मौजे बारामती, ता.बारामती, जि.पुणे येथील सर्वे नंबर-११/१ मधील चार हजार चौ.मी इतकी शासकीय जमीन महसूल व वन विभागाने दि.६/१०/२०२१ रोजीच्या शासन ज्ञापनाद्वारे प्रदान केली आहे. संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये बारामती येथे उपकेंद्र व रत्नागिरी इमारतीच्या बांधकामासाठी रु.१७७१.४४ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास मान्यता देण्याची विनंती केली होती. तद्नुषंगाने सदर प्रस्तावाची तांत्रिक पडताळणी करुन देण्याकरीता प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागास सादर करण्यात आला होता. सार्वजनिक बांधकाम विभागाने बारामती येथील उपकेंद्राच्या रु.१७७१.४४ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकाची परिगणना करुन प्रशासकीय मान्यतेसाठी येणारी विषयांकित कामांची किंमत रु.९०६.५७ लक्ष इतक्या रक्कमेस काही अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यास सहमती दर्शविली आहे. त्यानुसार सदर बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मौजे बारामती, ता.बारामती, जि.पुणे येथे यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे सातारा व सोलापूर जिल्ह्यासाठी उपकेंद्र व ग्रंथालय स्थापन करण्यासाठी उपकेंद्र व ग्रंथालय इमारतींच्या बांधकामास तक्ता "अ" मध्ये नमूद केलेल्या रु.९०६.५७ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास (Recapitulation Sheet) मुख्य

अभियंता, पुणे यांनी सहमती दर्शविल्यानुसार खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१. विद्यापीठाच्या प्राधिकरणाची आवश्यक ती मान्यता घेण्यात यावी.

२. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

३. प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घ्यावी.

४. तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबीच्या दराकरिता शासन परिपत्रक क्रमांक.२०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दि.११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

५. प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करून उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

६. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७. स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करून सदर कामे पूर्ण करावीत.

८. इमारतीमध्ये दिव्यांगाकरिता उपलब्ध करून द्यावयाच्या विविध सोयींबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

९. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. हा शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १२१/इमा-३, दि.१६.०६.२०१९, अनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११२६१६३११७८१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2021.11.26 16:33:44 +05'30'

**( अ. म. बाविस्कर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) कुलगुरू, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक
३) कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक
४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)

५) सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे/ औरंगाबाद.
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
७) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
८) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे/ नाशिक.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नाशिक.
१०) नियोजन विभाग (१४७१), मंत्रालय, मुंबई.
११) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-३)/(व्यय-५) मंत्रालय, मुंबई.
१२) मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३) मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४) मा.प्रधान सचिव. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.